**शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये सहायक अनुदाने (अनिवार्य) वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक-मराग्रं-२०२३/प्र.क्र. १३२ /ई-६५२२०६/ग्रं.क.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा :-**

1. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
2. शासन ज्ञापन उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक-मराग्रं-२०२३/प्र.क्र. १३२ /ई-६५२२०६/ग्रं.क.
3. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र जा.क्र.३२/२०२३-२४/६५४१, दि.२३.०१.२०२४.

**ज्ञापन :-**

शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या पहिल्या हप्त्याच्या परिरक्षण अनुदानासाठी रु. ८३,९५,६८,०००/- इतका निधी उपरोक्त वाचा क्र. २ येथील शासन ज्ञापनाव्दारे वितरीत व खर्च करण्यास ग्रंथालय संचालनालयास मान्यता देण्यात आली आहे.

२. ग्रंथालय संचालनालयाने उपरोक्त वाचा क्र. ३ येथील पत्राव्दारे शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या दुसऱ्या हप्त्याच्या परिरक्षण अनुदानासाठी निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार, सन २०२३-२४ मध्ये शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या अनुदानाचा दुसरा हप्ता अदा करण्यासाठी रु.२८,३७,५१,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी सदोतीस लक्ष एकावन्न हजार फक्त) इतका निधी ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. :-

अ) सदर खर्च करण्यासाठी लेखाधिकारी, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदर खर्चाकरीता "नियंत्रक अधिकारी" म्हणून संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे राहतील.

आ) अनुदानाच्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र ग्रंथालय संचालक यांनी सादर करणे आवश्यक राहील.

३. सदर खर्च, मागणी क्रमांक डब्ल्यू- ४, २२०५-कला व संस्कृती, १०५-सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (अनिवार्य) (२२०५०२९८) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मध्ये उपलब्ध अर्थसंकल्पीत तरतूदीतून भागविण्यात यावा.

**४.** सदर शासन ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ३२८/व्यय-५, दि.२६.०२.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. याबाबत शासन परिपत्रक वित्त विभाग अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ मधील अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

**५.** सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१५२०४२४२७८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2024.03.15 20:51:42 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. सर्व सहायक ग्रंथालय संचालक / जिल्हा ग्रंथालय अधिकारी/ ग्रंथपाल (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
८. कार्यासन, व्यय-५/अर्थ-८, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन, अर्थसंकल्प, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती ग्रंथालय कक्ष, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.